**सतत व समवर्ती लेखापरिक्षण याकरीता असलेल्या ८६ अस्थायी पदांना सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षासाठी मुदतवाढ देणेबाबत**
**पणन सहकारी संस्था.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सपस-२०२५/प्र.क्र.२२/२४ स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २५ मार्च, २०२५.

वाचा :-

१) शासन निर्णय , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः राजस-१००८/प्र.क्र. ५३८/५ स, दिनांक ५/५ २०११
२) शासन निर्णय ,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सपस- २०२३/ प्र.क्र.१४/२४ स, दिनांक २३/०९/ २०२४.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दिनांक ०३/०३/२०२५.
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक:- कक्ष-१/आस्था/पणन सहकारी संस्था/मुदतवाढ/२०२५/१९९, दिनांक २२/०१/२०२५

**शासन निर्णय :-**

पणन सहकारी संस्थांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणाकरीता असलेल्या ८६ स्थायी पदांना दिनांक **२८ फेब्रुवारी,२०२५** पर्यंत उपरोक्त वाचा (२) मधील शासन निर्णय, दिनांक २३/०९/२०२४ नुसार मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर ८६ अस्थायी पदांना **दिनांक १ मार्च , २०२५ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२५** पर्यंत मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावाला खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

१) कार्यालय प्रमुखाचे पद वगळून उर्वरित सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त असलेली पदे वगळण्यांत यावीत.
२) अस्थायी पदे विहित पध्दतीने भरलेली असावीत.
३) लेखापरिक्षण शुल्काची वसूली पूर्णत: होण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

**दिनांक १ मार्च , २०२५ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२५** पर्यंतच्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येणाऱ्या अस्थायी पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-२ | एस-१५: ४१८००-१३२३०० | ८ |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | एस-१४: ३८६००-१२२८०० | २ |
| ३ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | एस-१३: ३५४००-११२४०० | १० |
| ४ | उपलेखापरिक्षक | एस- ८: २५५००-८११०० | २५ |
| ५ | कनिष्ठ लिपीक | एस- ६: १९९००-६३२०० | १९ |
| ६ | नाईक / शिपाई | एस- १: १५०००-४७६०० | २२ |
| | **एकूण** | | ८६ |

२. उपरोक्त अटींचे पालन करण्याची जबाबदारी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी वरील वाढीव मुदतीत पदाचा आढावा घेऊन,सुधारित आकृतीबंधास वित्त विभागाची मान्यता घेण्यासाठी नियोजन करावे.

४. उपरोक्त अस्थायी कर्मचाऱ्यांसाठी होणारा खर्च संबंधित सहकारी पणन संस्थांकडून लेखापरिक्षण शुल्काद्वारे वसुल करण्यात यावा.

५. उपरोक्त बाबींवरील खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत दाखविण्यात यावा व सन २०२५-२०२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक व्ही-२**

**२४२५-सहकार**

**१०१-सहकारी संस्थांचे लेखापरिक्षण,**

**१०१-(एक)(ए) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)**

६. सदर शासन निर्णय उपरोक्त नमूद क्र.३ वरील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२५१०५६१७०९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANGITA DINESH SHELKE

Digitally signed by SANGITA DINESH SHELKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=9ace0ca0b129ab4da8f9e911057d75e7fbf6f6bd0b55e8ff7ca0deacfa15e1c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A16A0B4000A30DD7389BEC31D153FB1F2D63557A5E779E513EF76643F6613183, cn=SANGITA DINESH SHELKE
Date: 2025.03.25 10:57:11 +05'30'

**( संगिता दि.शेळके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३) अप्पर निबंधक (लेखापरिक्षण), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

४) जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, (सर्व)

५) विशेष लेखा परिक्षक वर्ग-२ (पणन), सहकारी संस्था - ठाणे, रत्नागिरी, नाशिक, धुळे, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, परभणी, लातूर, नांदेड, उस्मानाबाद, बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, नागपूर, भंडारा, चंद्रपूर.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रत्नागिरी, नाशिक, धुळे, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, परभणी, लातूर, नांदेड, उस्मानाबाद, बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, नागपूर, भंडारा, चंद्रपूर.

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,

८) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२

९) कार्यासन अधिकारी, ५ स / १२ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) निवड नस्ती २४ स